

मिचियो नावाचा मुलगा सेन्सेई मासा, एक तलवारीत तरबेज असणाऱ्या सेन्सई मासाचा शिष्य आहे. ते एक शानदार समुराई तलवार घडवण्यात आणि त्याला आकार देण्यात खूप मेहनत करतात. प्रत्येकजण ती तलवार खरेदी करू इच्छिते. आणि तिचा मालक होण्यास उत्सुक आहे.पण सेन्सेईला माहीत आहे की तलवार प्रत्येकासाठी नसते. मिचियो स्वतःला विचारतो की “त्या तलवारीसाठी कोण सगळ्यात योग्य आहे?”













# आदर्श तलवार

स्कॉट गोटो

मराठी : अश्विनी बर्वे





सेन्सेई मासा तलवार तयार करण्यात तज्ज्ञ होता तो पूर्ण जपानमध्ये प्रसिद्ध होता. त्यांच्या तलवारी आतापर्यंतच्या सगळ्यात चांगल्या तलवारीमधली एक मानली जाते. सेन्सेई आणि त्यांचा शिष्य मिचियो तलवार तयार करण्यात अगणित दिवस आणि तास घालवत. ते पात्याला आकार देण्यासाठी धातू परत परत गरम करत आणि हातोड्याने त्यावर मारत. मग ते पॉलिश करत आणि एक रेजर ब्लेडच्या किनाऱ्या सारखी त्याला धार लावत. सेन्सेई आणि मिचियोने खूप सावधपणे काम केले आणि अथक प्रयत्न करून आणि प्रत्येक पैलूकडे लक्ष दिले.

एकदा तलवार पूर्ण झाल्यानंतर शिष्य आणि मास्टर या दोघांनी तलवारीत काही दोष राहिले का हे बघण्यासाठी निरीक्षण केले.

"शानदार!" मिचियो म्हणाले,जेव्हा त्यांने आणि सेन्सेई यांनी आपल्या नवीन रचनेचा अभ्यास केला. “ही एकदम आदर्श आहे.”

“नाही," सेन्सेई यांनी उत्तर दिले, त्यांचे डोळे अजूनही पात्यावर होते. “वास्तवात काहीच आदर्श नसते. नेहमी त्यात काही ना काही सुधारणा होऊ शकते. लक्षात ठेव तू काहीही कर त्यात तुझे १००% प्रयत्न कर. आणि पुढे जात रहा आणि सतत शिकत रहा.”

“हो, सेन्सेई," मिचियोने अदबीने उत्तर दिले.

“खरंतर," सेन्सेई म्हणाले. “हो तू हे जरूर म्हणू शकतो की हे माझे सर्वश्रेष्ठ काम आहे.”

सेन्सेई, मिचियोकडे वळाले आणि त्यांनी डोळे मिचकावले. मग दोघं भरभरून हसले.









"हे बघ, अजून एक कठीण काम बाकी आहे," मास्तर उसासा टाकत म्हणाला, "या तलवारीसाठी योग्य मालक शोधण्यासाठी.“

“पण सेन्सेई," शिष्य म्हणाला, “शहरात शेकडो लढाऊ समुराई आहेत. ते काम कठीण व्हायला नको.?”

“अनेक आहेत," सेन्सेई यांनी उत्तर दिले. “पण ते सर्व योग्य नाहीत. अधिकांश ठग आहेत आणि धमक्या देणारे आहेत जे मूल्यांचे पालन करत नाही. तलवार कोणत्याही समुराईचा आत्मा असतो. एका न्यायपूर्ण तलवारीला एक उचित मालक मिळणे आवश्यक आहे.”

नवीन तलवारीची बातमी वेगाने पसरली. लवकरच एक समुराई ती खरेदी करण्यासाठी आला. एका सकाळी जेव्हा मिचियो दारापुढे स्वच्छता करत होता तेव्हा अचानक तो आपल्या पायांवर उभा राहिला. एका विशालकाय माणसाने केवळ एका हाताने हवेत उचलले.

“आपल्या मालकाला सांग,” आगंतुक छोट्या शिष्याला म्हणाला, “महान कात्सुओ इथं तलवार खरेदी करण्यासाठी आला आहे.” मग त्याने मिचियोला परत आपल्या पायांवर उभं केले.

क्रूर दिसणाऱ्या माणसाकडे एकटक बघत मिचियो एकदम दचकला. “हो सर,” म्हणत तो खाली वाकला.

“तो किती बलवान आणि आत्मविश्वासी आहे!” मिचियोने विचार केला. मग तो सेन्सेईला शोधण्यासाठी आत पळाला. असाच कोणीतरी महान योद्धा आमच्या तलवारीसाठी योग्य असेल,” त्याने विचार केला.

“मी शेकडो माणसांना सहज हरवले आहे.” सेन्सेईबरोबर बसत कात्सुओने फुशारकीने सांगितले, “मी अगणित गावांवर कब्जा मिळवला आहे. गाववाले मला बघताच घाबरून पळून जातात. मीच केवळ शक्तिशाली आहे आणि तुमच्या तलवारीसाठी लायक आहे.”

“तेव्हा काय होईल," सेन्सेई यांनी विचारले. “जर गाववाल्यांनी तुमच्यासाठी काम करण्यास नकार दिला तर?”

"हा-हा!" कत्सुओ रागाने ओरडले. “तेव्हा मी त्यांचे घर जाळून टाकेल, आणि मला प्रश्न विचारणाऱ्या लोकांचे मी सगळं काही नष्ट करून टाकेन.”

“मला क्षमा करा," सेन्सेई यांनी शांततेने उत्तर दिलं, “पण तुम्ही त्या तलवारीसाठी खूप क्रूर आणि अभिमानी आहेत. इथं आल्याबद्दल धन्यवाद.”

कत्सुओ रागात होता. तो उस्ताद आणि त्यांच्या शिष्याला शाप देत, पाय आपटत, तलवार तयार करणाऱ्याच्या घराच्या बाहेर पडला.

प्रथम मिचियोला सेन्सेईच्या निर्णयाचे आश्चर्य वाटले. खरंतर थोडावेळ विचार केल्यानंतर त्याच्या लक्षात आले विनम्रता ज्याच्याकडे आहे त्याच्याकडेच तलवार असायला पाहिजे.



दुसऱ्या दिवशी सकाळी मिचियो दरवाज्याची सफाई करत होता तेव्हाच चार माणसं एक पालखी घेऊन समोर थांबले. पालखी काही नोकर आणि पहारेकऱ्यानी घेरली होती. मग पार्टीचा प्रत्येक सदस्य सन्मानाने मान झुकवून उभा राहिला. त्यानंतर एक किंमती कपडे घालणारा माणूस खुर्चीवरून उठला.

“तुझ्या मालकाला जाऊन सांग,” नोकर जोरात ओरडला, की महान टोडा इथे प्रसिद्ध तलवार खरेदी करण्यासाठी आला आहे.”

मिचियोने महान टोडाकडे बघितले, ज्याने वळून एकदाही त्याच्याकडे बघितले नाही.मग मिचियोने नोकराला नमस्कार केला आणी आता गेला.

“केवढी सत्ता आहे! एवढे सारे लोक त्याची सेवा करत आहेत.” मिचियोणे विचार केला. असा सामर्थ्यशाली व्यक्ती आमच्या तलवारी साठी जरूर योग्य होईल.

"माझ्याकडे खूप राजकीय शक्ती आणि प्रभाव आहे," महान तोडा यांनी सेन्सीला स्पष्ट केले. "माझ्याकडे शेकडो सेवक आणि योद्धे आहेत जे माझ्या प्रत्येक आज्ञेचे पालन करतात. माझ्यासारखा महान पुरुषच अशा परिपूर्ण तलवारीला पात्र आहे."

"अच्छा, तुम्ही किती लढाया लढल्या?"सेन्सेई यांनी विचारले.

“मी, युद्धात लढाई? कधीच नाही,” महान टोडाने उत्तर दिले. “मी हे काम आपल्या सैनिकांवर सोडतो. हे माझे मोठेपणाचे सौभाग्य आहे.”

"मला क्षमा करा," सेन्सेई यांनी उत्तर दिले. “तुम्ही तुमच्यासाठी काहीच कमावले नाही. ही तलवार तुमच्यासाठी नाही. तुम्ही इथ आल्याबद्दल धन्यवाद.”

अपमानित आणि घाबरलेला महान टोडा लवकरच तलवार चालवणाऱ्याच्या घरातून बाहेर निघून गेला. पण परत मिचियोला आश्चर्य वाटले. पण त्याने विचार केल्यावर त्याच्या लक्षात आले की खूप मेहनत करणारी व्यक्तीच तलवारीची हकदार व्हायला पाहिजे.



दुसऱ्या दिवशी जेव्हा मिचियो फरशी पॉलिश करत होता. तेव्हा एक लहान माशी सतत त्रास देत होती. माशी सतत मिचियोच्या डोक्यावर घोंघावत होती. तेव्हाच एक अनोळखी माणूस आला ज्याने मिचियोला चकित केले. त्या माणसाचा चेहरा दगडासारखा थंड होता, आणि तरीही त्याचे डोळे आगीसारखे पेटलेले होते.

"क्षमा करा," तो माणूस कुजबुजला. "माझे नाव केंशिन आहे. मी एक लढाऊ आहे, मला तुझ्या मालकाकडून नवीन तलवार खरेदी करायची आहे."

'हो, सर," मिचियोने त्या माशीला हाकलत म्हटलं जी त्याला त्रास देत होती. मग एका झटक्यात केंशिनने आपली तलवार काढली आणि एक वार करून त्यांनी माशीला अर्धे कापले. मग त्याने आपली तलवार परत म्यान केली. मिचियो त्या साहसी लढवय्याकडे विस्मयाने बघत राहिला. मग तो वाकला आणि आपल्या मालकाला शोधायला गेला.

निश्चितपणे सेन्सेईला हा लढवय्या पसंत येईल असा विचार मिचियोणे केला. इतका शांत आणि साहसी त्याला एकदम योग्य उमेदवार वाटला.



“मी माझे जीवन केंजुत्सुला समर्पित केले आहे,” लढवय्याने सेन्सेईला म्हटले. “माझ्यासाठी सगळ्यात महत्वाचे हेच आहे की युगल-युद्ध जिंकणे आणि आपले कौशल्य परिपूर्ण ठेवण. माझ्यासारख्या समर्पित योद्धाजवळच अशी सिद्ध तलवार असणे गरजेचे आहे.”

“आणि तुम्हांला काय वाटते की शोगुन आणि लॉर्ड्स, सामान्य लोकांच्या बरोबर कसा व्यवहार करतात?” सेन्सेई यांनी विचारले.

“मला राजनिती सारख्या तुच्छ विषयात काही रस नाही,” केंशिन म्हणाला “मला जपानमधला सगळ्यात चांगला तलवारबाज होण्याची इच्छा आहे.”

"मला  क्षमा करा," सेन्सेई यांनी उत्तर दिले. “तुम्ही समर्पित आहात पण तुम्ही स्वार्थी पण आहेत. ही तलवार तुमच्यासाठी नाही.आपण इथं आलात त्याबद्दल धन्यवाद.”

मग केंशिनने आपले डोके फरशीवर टेकवले आणि तिथून चुपचाप निघून गेला. एकदा परत मिचियोला आश्चर्य वाटले. तेव्हा त्याला जाणवले की काळजीपूर्वक आणि प्रेमाने तयार केलेली तलवार त्यांच्याजवळच पाहिजे जे दुसऱ्यांची पर्वा करतात, आणि केवळ स्वतःची नाही.





दिवस जात राहिले आणि अनेक अनोळखी लोक आले पण कोणीच योग्य नव्हते.ते सगळे खूप क्रूर आणि विशेषाधिकार प्राप्त केलेले होते, किंवा खूप स्वार्थी होते.

या लोकांना भेटून थकून जाऊन, सेन्सेई आणि मिचियोने बाज़ारात जाण्यासाठी एक दिवस सुट्टी घेतली. गोड गोळी खात ते दुकानांच्या समोरून जात होते, ज्यात मासे, भाज्यांपासून इतर किराणामाल आणि खेळणी विकत होते.

उस्ताद आणि त्यांचा शिष्य दोघेही गर्दीच्या उत्साहाचा आनंद घेत होते, तेव्हाच एक मोठा माणूस वेगाने त्यांच्या जवळून पळाला.

“पकडा, चोर," एक दुकानदार ओरडला.

सेन्सेई आणि मिचियो यांनी काही करण्याच्या आधी एका तरुणाने चोराचा रस्ता रोखला. तो तरुण चोरापेक्षा खूप लहान होता, पण त्याचे शरीर ताकदवान दिसत होते आणि त्याच्याजवळ दोन तलवारी होत्या, एक लांब आणि एक छोटी जी त्याच्या पट्टयामध्ये खोचलेली होती.

"कृपया त्वरित पैसे परत कर,” तरुण समुराई त्या चोराला म्हणाला.

“माझ्या रस्त्यातून बाजूला हो आणि इथून पळ!” चोर ओरडला. मग त्याने एक मोठा चाकू काढला आणि समुराई वर वार केला.



तरुण योद्धाने लवकरच चोराला निःशस्त्र करून त्याला बेशुद्ध केले. त्याने एकदाही आपल्या दोन्ही तलवारींना स्पर्श केला नाही. मिचियो चकित झाला. सेन्सेईने अनुमोदन म्हणून आपली मान हलवली.

“तुम्ही मदत केली त्याबद्दल धन्यवाद," दुकानदार समुराईला म्हणाला, "कृपया, हे पैसे इनाम म्हणून तुम्हांला ठेवा.”

समुराई ने उत्तर दिले, “ योग्य काम करण्यासाठी कोणाला पुरस्कार द्यायला नको.तुमचे आभार पण मी हे पैसे घेऊ शकत नाही.”

जसा तरुण समुराई जाऊ लागला, सेन्सेईने मिचियोकडे बघितले आणि म्हटले, “जा आणि त्या तरुणाला आपल्या घरी आमंत्रित कर. त्याला सांग आपण कोण आहोत, पण सांगू नको की आपण त्याला का भेटू इच्छितो.

मिचियोने मान हलवली आणि पाहुण्याला बोलवायला गेला.
सेन्सेई तयारी करण्यासाठी घराकडे आला.



थोड्यावेळ जेव्हा समुराई घरात सेन्सेईजवळ बसला, तेव्हा मिचियोने गरम चहा आणला.

“माझे नाव ताकेशी आहे,“ तरुण नमस्कार करत म्हणाला. “मी निम्न-श्रेणीचा समुराई आहे. तुमच्याकडे येणे हा माझा सन्मान आहे, सेन्सेई मासा. तुमच्या कामाचा पूर्ण जपानमध्ये सन्मान केला जातो.

“नाही, मी तुम्हांला भेटून स्वतःचा सन्मान झाला आहे असे मला वाटते,” सेन्सेईने मान झुकवून म्हटले. “पण मला सांगा की तुम्ही त्या चोराला पकडतांना तुमची तलवार का वापरली नाही?”



"मला ते करण्याची गरज वाटली नाही," ताकेशीने उत्तर दिले. "कोणालाही विनाकारण जखमी करणे ताकदीचे नाहीतर कमकुवतपणाचे लक्षण आहे. मी आज माझी तलवारीचा वार करून तिचा अनादर केला असता आणि तलवारीचा अनादर म्हणजे आत्माचा अनादर करणे होय."

मिचियो गुपचूप जवळ बसला, आणि हस्त तरुण समुराईचे बोलणे ऐकू लागला.

"तू खऱ्या अर्थाने खूप कुशल आहे," सेन्सेई म्हणाले.

"मी अजूनही पूर्ण कुशल नाही," ताकेशीने उत्तर दिले. "युद्धाची कला शिकणे संपत नाही आणि त्यासाठी खूप मेहनत करावी लागते, म्हणून मी रोज प्रशिक्षण घेतो आणि अभ्यास करतो."

"तू आज त्या दुकानदाराला मदत केली का? नक्कीच तू त्याला आधीपासून ओळखत असेल?" सेन्सेई यांनी विचारले.

ताकेशीने उत्तर दिले "माझ्याजवळ मदत करण्याची शक्ती होती आणि जेव्हा तुमच्याजवळ शक्ती आहे तेव्हा दुसऱ्याला नक्कीच मदत केली पाहिजे."





“खूप छान," सेन्सेई यांनी उत्तर दिले. “तुम्ही तेच आहात ज्यांना आम्ही शोधत होतो.”

मिचियोने नवीन बनवलेली तलवार सेन्सेईकडे सोपवली. सेन्सेई यांनी ती ताकेशीला भेट दिली. तलवार बघून युवा समुराई अवाक झाला. मिचियोला आपल्या मालकाचा निर्णय पूर्णपणे समजला आणि मग तो बसला.

“ही तलवार तुमच्याजवळ ठेवा,” सेन्सेई म्हणाले. “हिच्यामुळे तुम्हांला एक योद्धा आणि एक व्यक्तीच्या रुपात आपले मन, शरीर आणि आत्मा विकसित करण्यास मदत मिळेल.”

ताकेशीने दोन्ही हातांनी तलवार पकडली. “मी या मौल्यवान भेटी इतका योग्य होण्याचा प्रयत्न करेन,” त्याने आपले डोके फरशीवर टेकवत म्हटले.

सेन्सेई आणि मिचियोने ताकेशीला निरोप दिला आणि त्याला जातांना बघितले.

“चल मिचियो," सेन्सेई म्हणाले.

“आता पुढची तलवार करण्याची वेळ आली आहे का?” शिष्याने विचारले.





सेन्सेई यांनी स्मित करत आपल्या प्रशिक्षणार्थी शिष्याकडे बघितले. तो ही त्यांच्याकडे बघून हसला आणि परत स्वीकार आहे हे सांगण्यासाठी त्याने आपली मान हलवली. दोघांनी मान वाकवली आणि लोखंडाच्या भट्टी कडे निघाले.

## प्राचीन जपानमध्ये तलवार तयार करतात.

दुसऱ्या शताब्दीमध्ये ख्रिस्तपूर्व पासून आधुनिक काळापर्यंत जपानी संस्कृती मध्ये तलवार बनवण्याचा मोठा आणि विविध इतिहास आहे. मी ही कहाणी १५०० च्या दशकाच्या शेवटी तोकुगावा शोगुनेट च्या सुरवातीला सेट केली आहे. शोगुनने ६५० पासून अधिक वर्षापर्यंत जपानवर राज्य केले. त्यांचे निर्णय समुराई, किंवा योद्धा वर्गाद्वारा लागू  होत असत.

समुराई तलवार तयार करणे ही एक पवित्र कला होती. तलवारीला समुराईचा आत्मा मानला जात असे. आणि ती त्यांचा सन्मान आणि चारित्र्यचे प्रतिनिधित्व करत असे. एखादा जपानी तलवार निर्माता, समुराईची तलवार बनवण्याच्या आधी आपलं मन आणि आत्मा शुद्ध करण्यासाठी नेहमी ध्यान, उपवास व प्रार्थना करत असे.

केवळ समुराईला तलवारीची एक जोडी म्हणजे दोन तलवारी घेऊन चालण्याची परवानगी होती, त्यात एक लांब आणि एक छोटी असे.

अर्थात ते या जपानी कहाणीमध्ये ती गोष्ट स्पष्ट होत नाही पण जपानी तलवार तयार करतांना अनेक वेगवेगळे शिल्पकार सामील असत. स्वॉर्डस्मिथ, मुख्य बॉडी तयार करत असे, पॉलिशर्स, पात्याला धार लावत असे, लाकडाची मुठ सुतार करत असत आणि इतर कामगार तलवारीचे गार्ड आदिचे निर्माण करत असत.

जपानमध्ये गुरु / शिष्य किंवा उस्ताद / शिष्य यांचे सबंध  पश्चिमी मॉडलपेक्षा खूप वेगळे होते.गुरूंना जवळजवळ कोणी प्रश्न विचारत नसे.प्रशिक्षणार्थी साधारणपणे गुरूंच्या मागे उभे राहून फक्त बघत असे. हेच कारण आहे की मिचियोला आपले स्वतःचे निष्कर्ष काढण्यासाठी सोडून दिले होते की तलवारबाजला सेन्सेईची मंजुरी का मिळत नव्हती. या कहाणीत त्या पारंपरिक भूमिकां निभावण्याचा प्रयत्न आहे जो प्राचीन जपानमध्ये प्रशिक्षणार्थी आणि गुरु निभावत असत.

